महाराष्ट्र राज्य लॉटरी
दि. १ सप्टेंबर २०११ पासून काढण्यात येणा-या
**"महाराष्ट्र गोल्ड मिनी (गुरूवार) / महाराष्ट्र सिल्वर मिनी (शनिवार)"** या सोडतीची बक्षिसरचना व कार्यपध्दती.

**महाराष्ट्र शासन**
वित्त विभाग
शासन निर्णय क्र.मरालॉ २०११/प्र.क्र.१४७/ लॉटरी -२
नवीन प्रशासन भवन , ८ वा मजला , मंत्रालयासमोर,
मुंबई - ४०० ०३२
दिनांक :१७ ऑगस्ट, २०११

शासन निर्णय

महाराष्ट्र राज्य लॉटरीच्या निरनिराळया पारंपारिक साप्ताहिक सोडती रविवार खेरीज इतर दिवशी काढण्यात येतात. सध्या चालु असलेल्या महाराष्ट्र राज्य लॉटरीच्या पारंपारिक साप्ताहिक सोडतींव्यतिरिक्त प्रत्येक गुरूवारी व शनिवारी **"महाराष्ट्र गोल्ड मिनी (गुरूवार) / महाराष्ट्र सिल्वर मिनी (शनिवार)"** या नावाने नवीन साप्ताहिक सोडती काढण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

१.१ हया साप्ताहिक सोडती गुरूवार दि. १ सप्टेंबर २०११ पासून काढण्यात याव्यात .

१.२ "महाराष्ट्र गोल्ड मिनी (गुरूवार) / महाराष्ट्र सिल्वर मिनी (शनिवार)" ही साप्ताहिक सोडत केंद्र शासनाचा लॉटरी नियम-२०१० प्रमाणे कार्यान्वित केली आहे.

१.३ त्यामधील प्रमुख मुद्दे खालील प्रमाणे आहेत:-

शासनाने महाराष्ट्र राज्य लॉटरीच्या साप्ताहिक "महाराष्ट्र गोल्ड मिनी (गुरूवार) / महाराष्ट्र सिल्वर मिनी (शनिवार)" या सोडतींसाठी प्रत्येक मालिकेत ५०,००० तिकीटे याप्रमाणे असलेल्या तीन मालिकांत एकूण १,५०,००० तिकीटे मुद्रीत करण्याचा निर्णय घेतला आहे.

१.४ या सोडतीत पहिले (सामायिक) बक्षिस रु. १ लाखाचे बक्षिस ठेवण्यात आलेले आहे.

२. साप्ताहिक "महाराष्ट्र गोल्ड मिनी (गुरूवार) / महाराष्ट्र सिल्वर मिनी (शनिवार)" सोडतीची तिकीटे उपसंचालक (वि.व ले.) महाराष्ट्र राज्य लॉटरी, शिवडी (पू.),मुंबई-१५ यांचे कार्यालयातून सर्व विक्रेते व इतरांना उपलब्ध होतील.

या बक्षिसरचनेतील रु. १०,०००/- व त्याखालील असणाऱ्या सर्व बक्षिसांचे प्रदान ग्राहकांना/ वितरीत केल्याबद्दल त्यांच्या प्रतिपुर्तीनंतर नेहमीप्रमाणे विक्रेत्यांना २ % सेवाआकार देण्यात येईल.

या सोडतीची तिकीट विक्री उपसंचालक (वित्त व लेखा), महाराष्ट्र राज्य लॉटरी यांच्या कार्यालयातून करताना महाराष्ट्र राज्य लॉटरीच्या विक्रेत्यांना यांना या तिकीट विक्रीच्या १०० तिकीटांचे एका पुस्तकावर (M.R.P. Rs. 10/- each ticket) तिकीटांच्या दर्शनी किंमतीवर एकाच वेळी घेण्याकरिता पुढीलप्रमाणे घाऊक सूट (Discount) देण्यात येईल.

| अ.क्र | तिकीटांची संख्या | घाऊक सूट |
| --- | --- | --- |
| १ | १०० ते २०००० तिकीटे | २० % |
| २ | २०००१ ते ५०००० तिकीटे | २४ % |
| ३. | ५०००१ पेक्षा अधिक | २६ % |

३. दि. ०१ सप्टेंबर-२०११ पासून काढण्यात यावयाच्या **"महाराष्ट्र गोल्ड मिनी (गुरूवार) / महाराष्ट्र सिल्वर मिनी (शनिवार)"** या साप्ताहिक सोडतीची बक्षिसरचना पुढीलप्रमाणे असेल.

**महाराष्ट्र गोल्ड मिनी (गुरूवार) / महाराष्ट्र सिल्वर मिनी (शनिवार)**
**सोडतींची बक्षिसांची योजना**

३ मालिका
तिकीटांचे क्रमांक १०,००० ते ५९,९९९ प्रत्येक मालिकेत
सोडत दिनांक ०१/०९/२०११ पासून
वेळ दुपारी ३.०० वा.

प्रत्येक मालिकेत ५० हजार तिकिटे
एकूण तिकिटे १५००००
तिकीटाची किंमत रू.१०/-

| बक्षिसे | बक्षिसाची रक्कम रूपये | प्रत्येक मालिकेतील बक्षिसांची एकूण संख्या | सर्व मालिकेतील बक्षिसांची एकूण संख्या | सर्व मालिकेतील बक्षिसांची एकूण रक्कम रूपये | विक्रेता बोनस (प्रत्येक मालिकेत ) | एकूण विक्रेता बोनस रूपये |
|---|---|---|---|---|---|---|
| पहिले (सामायिक) बक्षिस (पूर्ण क्रमांक) | १,००,००० | -- | १ | १,००,००० | १००० | १००० |
| प्रोत्साहनपर बक्षिस (पहिल्या बक्षिसाची मालिका वगळून उर्वरित मालिकेतील पहिल्या बक्षिसाच्या क्रमांकासाठी) | १०,००० | | २ | २०,००० | | |
| दुसरे बक्षिस (पूर्ण क्रमांक) प्रत्येक मालिकेत | ७००० | १ | ३ | २१००० | | |
| तिसरे बक्षिस (शेवटचे ४अंक) प्रत्येक मालिकेत | ५,००० | ५ | १५ | ७५,००० | | |
| चौथे बक्षिस (शेवटचे ४अंक) प्रत्येक मालिकेत | २,००० | ५ | १५ | ३०,००० | | |
| पाचवे बक्षिस (शेवटचे ४अंक) (१० जुळवण्या) | १००० | ५० | १५० | १,५०,००० | | |
| सहावे बक्षिस (शेवटचे ४अंक) (१० जुळवण्या) | ५०० | ५० | १५० | ७५,००० | | |
| सातवे बक्षिस (शेवटचे ४अंक) (१० जुळवण्या) | १०० | ५० | १५० | १५,००० | | |
| आठवे बक्षिस (सर्व मालिकांसाठी) (कोणत्याही ४ अंकावर काढण्यात येणाऱ्या क्रमांकास व त्या पुढील तसेच मागील प्रत्येक दहाव्या क्रमांकास रू. २०/- चे बक्षिस देण्यात येईल ) | २० | | १५,००० | ३,००,००० | | |
| **एकूण** | | | **१५४८६** | **७,८६,०००** | | **१०००** |

वरील बक्षिसरचनेत विक्रेता बोनसचाही समावेश करण्यात आला आहे. पहिल्या क्रमांकाच्या बक्षिसपात्र तिकीटासाठी रू. १०००/- इतकी रक्कम विक्रेता बोनस म्हणून देण्यात येईल.

**४. सोडतीची कार्यपध्दती :-**

साप्ताहिक **"महाराष्ट्र गोल्ड मिनी (गुरूवार) / महाराष्ट्र सिल्वर मिनी (शनिवार)"** या सोडतीकरीता सोडतीचे ठिकाणी ठळकपणे दिसतील अशा ठिकाणी ६ ड्रम ठेवले जातील प्रत्येक मालिकेमध्ये १०,००० ते ५९,९९९ असे तिकीटांचे क्रमांक असतील. पहिल्या ड्रममध्ये मालिकांची अद्याक्षरे व क्रमांक असतील, दुसऱ्या ड्रममध्ये १ ते ५ अंकाची प्रत्येकी एक याप्रमाणे ५ चकत्या टाकण्यात येतील. बाकी ४ ड्रममध्ये ० ते ९ अंकाच्या प्रत्येकी एक चकती याप्रमाणे दहा चकत्या टाकण्यात येतील. पंचमंडळाच्या समोर प्रत्येक चकती प्लॅस्टिक/रबरी आवरणात(पिशवीत) ठेवली जाईल. त्यामुळे चकतीवरील अंक दिसणार नाही. पंचमंडळाच्या अध्यक्षांनी घंटी वाजविल्यावर सर्व ड्रम एकाच वेळी फिरविले जाऊन सोडतीची सुरुवात होईल. अध्यक्षांनी पुन्हा घंटी वाजविल्यावर सर्व ड्रम एकाच वेळी फिरवायचे थांबविले जातील. त्यानंतर प्रत्येक ड्रममधून एक पिशवी काढून त्यातील चकतीवरील अंक पंचांना दाखविला जाईल. अध्यक्ष तो अंक घोषित करतील. अंक ज्या क्रमाने निघतील त्या क्रमाने फलकावर प्रदर्शित केले जातील

४.१ या सोडतीमध्ये दुसऱ्या क्रमांकाच्या रु.७,०००/-च्या बक्षिसाकरिता एक पूर्ण भाग्यवान क्रमांक प्रत्येक मालिकेसाठी स्वतंत्ररित्या निश्चित करण्यात येईल. त्यानंतर तिसरे, चौथे, पाचवे, सहावे व सातवे क्रमांकाचे बक्षिस निश्चित करण्याची कार्यपध्दती पुढीलप्रमाणे राहील.

**४.२ तिसरे बक्षिस रू. ५,०००/-** तिसऱ्या रु ५,०००/- च्या बक्षिसासाठी शेवटच्या ४ ड्रम मधून ४ अंकाची एक वेगवेगळी प्रत्येक मालिकेसाठी स्वतंत्रपणे जुळवणी काढण्यात येईल. ज्या तिकीटाच्या शेवटी अशा अंकाची जुळवणी आली असेल अशी त्या त्या मालिकेतील सर्व तिकीटे रू. ५,०००/- च्या तिसऱ्या बक्षिसासाठी पात्र असतील.

**४.३ चौथे बक्षिस रू. २०००/-** चौथ्या रु. २,०००/- च्या बक्षिसासाठी शेवटच्या ४ ड्रम मधून ४ अंकाची एक वेगवेगळी प्रत्येक मालिकेसाठी स्वतंत्रपणे जुळवणी काढण्यात येईल. ज्या तिकीटाच्या शेवटी अशा अंकाची जुळवणी आली असेल अशी त्या त्या मालिकेतील सर्व तिकीटे रू. २,०००/- च्या चौथ्या बक्षिसासाठी पात्र असतील.

**४.४ पाचवे बक्षिस रू. १,०००/-** पाचव्या रु. १,०००/- च्या बक्षिसासाठी शेवटच्या ४ ड्रममधून ४ अंकाच्या अशा दहा जुळवण्या काढण्यात येतील. ज्या तिकीटाच्या शेवटी अशा अंकाची जुळवणी आली असेल अशी त्या त्या मालिकेतील सर्व तिकीटे रू. १,०००/- च्या पाचव्या बक्षिसासाठी पात्र असतील.

**४.५ सहावे बक्षिस रू. ५००/-** सहाव्या रु. ५००/- च्या बक्षिसासाठी शेवटच्या ४ ड्रममधून ४ अंकाच्या अशा दहा जुळवण्या काढण्यात येतील. ज्या तिकीटाच्या शेवटी अशा अंकाची जुळवणी आली असेल अशी त्या त्या मालिकेतील सर्व तिकीटे रू. ५००/- च्या सहाव्या बक्षिसासाठी पात्र असतील.

**४.६ सातवे बक्षिस रू. १००/-** सातव्या रु. १००/- च्या बक्षिसासाठी शेवटच्या ४ ड्रममधून ४ अंकाच्या अशा दहा जुळवण्या काढण्यात येतील. ज्या तिकीटाच्या शेवटी अशा अंकाची जुळवणी आली असेल अशी त्या त्या मालिकेतील सर्व तिकीटे रू. १००/- च्या सातव्या बक्षिसासाठी पात्र असतील.

## ४.७ आठवे बक्षिस रू. २०/- चे काढण्याची कार्य पध्दती :-

आठव्या रु. २०/- च्या बक्षिसासाठी कोणताही ४ अंकाचा एक क्रमांक काढण्यात येईल त्या क्रमांकास व त्या क्रमांकाच्या पुढील तसेच मागील येणाऱ्या प्रत्येकी १० व्या क्रमांकास रू.२०/- चे आठवे बक्षिस सर्व मालिकांसाठी देण्यात येईल.

**वरील सर्व मालिकांचे बक्षिस विजेते क्रमांक काढल्यानंतर पहिले बक्षिस व प्रोत्साहनपर बक्षिस काढण्यात येईल.**

## ५. पहिल्या क्रमाकांचे रू. १,००,०००/- चे बक्षिस काढण्याची कार्यपध्दती :-

या साप्ताहिक सोडतीमध्ये **तीन मालिकात मिळून रूपये एक लाखाचे एक (सामायिक) पहिले बक्षीस** ठेवण्यात आलेले असून त्यासाठी प्रथमतः तीन मालिकांमधून एक भाग्यवान मालिका निश्चित करण्यात येईल. त्यासाठी प्रत्येक मालिकेची अद्याक्षरे व क्रमांक असलेली प्रत्येकी एक चकती घेण्यात येऊन ती प्रत्येक चकती स्वतंत्र प्लॅस्टिक/रबरी आवरणात घालून पंचमंडळाच्या समोर स्वतंत्र ड्रममध्ये ठेवली जाईल. अध्यक्षांनी घंटी वाजवून इशारा केल्यावर ड्रम फिरविला जाऊन व पुन्हा घंटी वाजवून इशारा केल्यावर ड्रम थांबविण्यात येईल. ड्रममधून एकच पिशवी(पाऊच) बाहेर काढून त्यातून चकती बाहेर काढण्यात येईल व ती पंचमंडळाला दाखविण्यात येईल. अध्यक्ष त्या चकतीवरील मालिकेच्या अद्याक्षरांची घोषणा करतील. त्यानंतर वरील परिच्छेद ४ मध्ये विहित केलेल्या पध्दतीने भाग्यवान क्रमांक काढण्यात येईल.

## ५.१ रू. १०,०००/- चे प्रोत्साहनपर बक्षिस काढण्याची कार्य पध्दती :-

या प्रोत्साहनपर बक्षिसासाठी पहिल्या क्रमांकाच्या बक्षिसाची मालिका वगळून उर्वरित दोन मालिकांसाठी पहिल्या बक्षिसाच्या भाग्यवान क्रमांकास रू. १०,०००/- चे प्रोत्साहनपर बक्षिस देण्यात येईल.

**६.** पंचमंडळाचे सदस्य त्यांना पुरविलेल्या बक्षिस विजेत्या क्रमांकाच्या नोंदवहीत विजेत्या क्रमांकाची नोंद करुन घेतील व त्या प्रतीवर सही करतील आणि ती प्रत निकालाच्या अभिलेखाची विश्वसनीय प्रत म्हणून ठेवली जाईल.

**६.१** या सोडतीमध्ये कोणत्याही बक्षिसामध्ये एकापेक्षा जास्त भाग्यवान क्रमांक निश्चित करताना एखादा क्रमांक पुन्हा आल्यास तो रद्द करुन त्या ऐवजी पुन्हा नवीन भाग्यवान क्रमांक निश्चित करण्यात येईल.

**६.२** या सोडतीतील बक्षिस विजेत्याने कोणत्याही बक्षिसाची मागणी करताना त्यास मूळ तिकीट शासनाकडे सादर करणे बंधनकारक राहील, तसेच कोणत्याही तिकीटांवर एकाच बक्षिसाची मागणी करता येईल.

६.३ महाराष्ट्र राज्य लॉटरीच्या कोणत्याही सोडतीमधील एखाद्या बक्षिसाकरिता एकापेक्षा जास्त पूर्ण भाग्यवान क्रमांक किंवा जुळवण्या काढण्यात येत असतील अशा वेळी कोणत्याही क्रमांकाची त्याच मालिकेत पुनरावृत्ती झाल्यास किंवा दोन्ही क्रमांक /एकापेक्षा जास्त क्रमांक सारखे आल्यास ते नंतर काढलेले क्रमांक रद्द करून त्याऐवजी नवीन क्रमांक काढण्यात येतील.

६.४ वर नमुद केल्याप्रमाणे या सोडतीमधील बक्षिस विजेत्या तिकीटाचे क्रमांक निश्चित करण्यासाठी ड्रम किंवा विजेवर चालणारी व चक्रावर क्रमांक लावलेली (ड्रॉ मशीन) सोडत यंत्र, वा त्याचप्रमाणे सोडत जलद काढण्याच्या शासनाच्या दृष्टीने योग्य पद्धतीचा अवलंब सोडत काढताना करण्यात येईल.

सदर शासन निर्णय शासनाच्या WWW.Maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध केला असून त्याचा संगणक सांकेतांक 201108231716480001 असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

(अ. मा. आत्राम)
उपसंचालक, राज्य लॉटरी तथा
अवर सचिव, वित्त विभाग.

प्रति,

१. मा. उप मुख्यमंत्री (वित्त), मंत्रालय, मुंबई ३२.
२. मा. राज्यमंत्री (वित्त), मंत्रालय, मुंबई ३२.
३. प्रधान सचिव / सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई ३२.
४. प्रधान सचिव /सचिव, **गृह विभाग**, मंत्रालय, मुंबई ३२
५. अतिरिक्त पोलीस महासंचालक (कायदा व सुव्यवस्था)
६. संचालक, लेखा व कोषागारे, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
७. महासंचालक, शासकीय मुद्रण, लेखनसामग्री व प्रकाशने
८. संचालक, अल्पबचत व राज्य लॉटरी
९. महालेखापाल, महाराष्ट्र (लेखा व अनुज्ञेयता) (लेखापरीक्षण) मुंबई/नागपूर.
१०. महासंचालक, माहिती व जनसंपर्क, मंत्रालय, मुंबई.
११. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
१२. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
१३. उपसंचालक (वित्त व लेखा), महाराष्ट्र राज्य लॉटरी, शिवडी (पूर्व) मुंबई १५.
१४. कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन, वित्त विभाग (प्रशासन -४) मंत्रालय, मुंबई.
१५. निवड नस्ती लॉटरी - २.